**मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना दि.०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ मिळणे बाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय - मुवाढ -२०२५/(प्र.क्र.९१/२५)/लाक्षेवि (आस्था)**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक: - २१/०४/२०२५.**

**संदर्भ** :- १. शासन निर्णय क्र.मुवाढ- २०२४/(प्र.क्र.१४४/२४)/लाक्षेवि (आस्था), दि.०७/१०/२०२४.
२. वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३/०३/२०२५.
३. मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र जा.क्र.लाक्षेवि (जसंवि)/आस्था-२/२२३, दि.२४/०१/२०२५.

**<u>प्रस्तावना :-</u>**

मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर या कार्यालयाच्या अधिपत्याखालील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये दि.०१/०९/२०२४ ते दि.२८/०२/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर यांनी संदर्भ क्र. ३ येथील दि.२४/०१/२०२५ रोजीच्या पत्रान्वये त्यांचे कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना दि.०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ पर्यंत मुदतवाढ मिळणेबाबत विनंती केलेली आहे.

वित्त विभागाने संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये, सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतू, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

संदर्भ क्र. ३ येथील प्रस्तावास अनुसरुन, मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर यांचे कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना दि.०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>शासन निर्णय -</u>**

मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर यांनी संदर्भ क्र.३ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावातील उपलब्ध माहिती विचारात घेऊन खालील तक्त्यामध्ये दर्शविल्याप्रमाणे मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर यांचे कार्यालयातील कार्यालयनिहाय आकृतीबंधानुसार मंजूर आस्थापनेवरील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना संदर्भ क्र.२ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार, दि.०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यास खालील अटींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | दि.०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ पर्यंत मुदतवाढ | | लेखाशिर्ष |
|---|---|---|---|---|
| | | सुधारीत आकृतीबंधानुसार मंजूर पदे नियत अस्थायी आस्थापना | रुपांतरित अस्थायी आस्थापना | |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर. | ३०<br>( विवरणपत्र-१ ) | ०० | मागणी क्रमांक आय - ५<br>४७०१ - मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च<br>८० सर्वसाधारण<br>(०४) विविध पाटबंधारे विकास महामंडळांना भाग भांडवली अंशदान ( वेतन )<br>(०४ ) (०५) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (अनिवार्य)<br>०१, वेतन<br>३२, अंशदाने<br>(४७०१ आय २०४ ) |

मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर कार्यालयांतर्गत आकृतीबंधानुसार ३० पदे नियत अस्थायी आस्थापनेवरील आहेत आता या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० मंजूर पदांना ती सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाही, तसेच ती पदे सुधारित आकृतीबंधानुसार मंजूर झालेल्या ४५२९७ पदांच्या मर्यादेत आहेत. या अटीच्या अधीन राहून दि.०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. उपरोक्त पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत राहतील.
२. ही पदे आकृतीबंधानुसार मंजूर असतील व सहा महिन्यापेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नसतील, तसेच पदे व्यपगत झालेली नसतील.
३. मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर यांनी संदर्भ क्र ३.अन्वये सादर केलेल्या प्रस्तावातील उपलब्ध माहितीनुसार पदांची संख्या / पदामधील घट / पदामधील वाढ / सेवानिवृत्ती इ. माहिती अंतिम / अचूक आहे असे गृहित धरून पदांना मूदतवाढ देण्यात येत आहे. तसेच यानुषंगाने शासनास पाठविलेल्या प्रस्तावातील पदांची आकडेवारी ही अचुक असल्याची खातरजमा ही संबंधित क्षेत्रीय कार्यालयाने आपल्यास्तरावर करण्याच्या अटीच्या अधीन राहून तसेच याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची असल्याचे गृहीत धरुन पदांना मूदतवाढ देण्यात येत आहे.
४. या सर्व पदांचा पुढील मुदतवाढीचा प्रस्ताव विहित प्रपत्रात प्रमाणपत्रासह विहित वेळेत सादर करण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/ आ.पु.क., दि.०३/०३/२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०२५०४२११७५०४०८२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA SHYAM MESHRAM

Digitally signed by PRADNYA SHYAM MESHRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=327f48fc91004ad3ef5a6ebc89e6964b30682a841a4ee2d95624fca82a93ab47, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=226F0D03348BA1C546030C101D31C947F7247A2CB501F8CAFE8198EF7E26E956, cn=PRADNYA SHYAM MESHRAM
Date: 2025.04.21 17:51:25 +05'30'

**(प्रज्ञा मेश्राम)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र** :- विवरणपत्र-१ प्रमाणे

**प्रति**,

१. महालेखपाल (१)(२), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

२. महालेखापाल (१)(२), (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

३. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर.

४. मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर,

त्यांना कळविण्यात येते की, प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजूरी दिलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या व्यतिरिक्त इतर अधिकारी/कर्मचारी यांची वेतन व देयके अदा केल्यास तसेच या शासन निर्णयान्वये दिलेल्या मंजूरीचा प्रत्यक्ष/अप्रत्यक्षरित्या चुकीचा अर्थ लावून अन्य अधिकारी/कर्मचारी यांची वेतन देयके अदा केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांवर राहील. त्याचप्रमाणे अस्थायी पदांना मुदतवाढ देत असताना, वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलल्या शासन निर्णयातील सूचना/अटींची पूर्तता होत असल्याबाबत खातरजमा करण्याबाबतची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांवर राहील.

५. जिल्हा कोषागार कार्यालय, छत्रपती संभाजीनगर,

६. वित्त विभाग (व्यय-१२/अर्थ-१९/ वित्तीय सुधारणा-१)/विनियम, मंत्रालय, मुंबई-४०००३२,

७. कार्यासन अधिकारी, आ (प्रशि/अर्थ-१/२), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

८. निवड नस्ती/लाक्षेवि (आस्था).

## विवरणपत्र - १

**शासन निर्णय क्रमांक-मुवाढ-२०२५/( प्र.क्र.९१/२५)/ला (आस्था), दि. २१/०४/२०२५ चे सहपत्र**

| **अ.क्र.** | **पदांचे नाव** | **दि.०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ पर्यंत मुदतवाढ दिलेली पदे** |
|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक | १ |
| २ | सहायक मुख्य प्रशासक | २ |
| ३ | उप विभागीय अभियंता / अधिकारी / स.अ.श्रेणी-१ | ३ |
| ४ | विशेष अधीक्षक | १ |
| ५ | कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता | ३ |
| ६ | आरेखक/प्रमुख आरेखक | १ |
| ७ | मुख्य दप्तर कारकून | १ |
| ८ | अधीक्षक | १ |
| ९ | वरिष्ठ लिपिक | २ |
| १० | लघुलेखक(उच्चश्रेणी) | १ |
| ११ | कनिष्ठ लिपिक | २ |
| १२ | टंकलेखक | ३ |
| १३ | दुरध्वनी चालक | १ |
| १४ | प्रथम लिपिक | १ |
| १५ | वाहनचालक | १ |
| १६ | दप्तरी | १ |
| १७ | शिपाई | ३ |
| १८ | नाईक | १ |
| १९ | चौकीदार | १ |
| | **एकूण** | **३०** |

PRADNYA SHYAM MESHRAM

Digitally signed by PRADNYA SHYAM MESHRAM
DN: CN = PRADNYA SHYAM MESHRAM, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2025.04.21 17:52:03 +05'30'

**(प्रज्ञा मेश्राम)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**